विशेष मागास प्रवर्गातील “गोवारी” समाजातील लाभार्थ्यांसाठी घरकूल योजना राबविण्याबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**इतर मागास बहुजन कल्याण विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः संकीर्ण-२०२४/प्र.क्र.०९(२)/योजना-३**
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२
दिनांक : १६ मे, २०२५.

**संदर्भ :-** इतर मागास बहुजन कल्याण विभाग, शासन निर्णय समक्रमांक, दिनांक १५.१०.२०२४

**प्रस्तावना :-**

आदिवासी विकास विभागामार्फत अनुसूचित जमातींसाठी सुरु असलेल्या योजनांच्या धर्तीवर विशेष मागास प्रवर्गातील गोवारी समाजबांधवांच्या विकासासाठी विशेष कार्यक्रम वित्त विभागाच्या सहमतीच्या अधीन राहून राबविण्यास या विभागाच्या संदर्भाधिन दिनांक १५.१०.२०२४ रोजीच्या शासन निर्णयान्वये मान्यता देण्यात आली आहे. सदरहू विशेष कार्यक्रमांतर्गत राज्याच्या ग्रामीण भागातील विशेष मागास प्रवर्गातील गोवारी समाजातील लाभार्थ्यांसाठी घरकूल योजना अंमलबजावणीसाठी विहीत कार्यपद्धती, योजनेच्या लाभार्थ्यांसाठी पात्रतेचे निकष व अटी विहीत करण्यासाठी मा.मंत्रिमंडळाच्या दिनांक २९/०४/२०२५ रोजीच्या बैठकीत निर्णय घेण्यात आला आहे. त्यानुषंगाने सदर योजना राबविण्याची बाबा शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

मा.मंत्रिमंडळाच्या दिनांक २९/०४/२०२५ रोजीच्या बैठकीत दिलेल्या मान्यतेनुसार, राज्याच्या ग्रामीण भागातील गोवारी समाजातील लाभार्थ्यांकरीता घरकुल योजना राबविण्यास याद्वारे शासन मान्यता देण्यात येत आहे.

२. सदरहू योजनेंतर्गत प्रथमत: घरकुल-टप्पा-१ राबविण्यात येईल. सदरहू घरकुल-टप्पा-१ अंतर्गत १०,००० वैयक्तिक लाभार्थ्यांसाठी घरकुले बांधण्यास व त्याकरीता रूपये १२५.०० कोटी इतक्या निधीस मंजूरी देण्यात येत आहे.

३. सदरहू योजनेच्या अंमलबजावणीची कार्यपद्धती खालीलप्रमाणे आहे.

| | | |
|---|---|---|
| १. | **पात्रता निकष** | १) लाभार्थी कुटुंब राज्याच्या ग्रामीण भागातील गोवारी समाजातील असावे.<br>२) लाभार्थी कुटुंबाचे वार्षिक उत्पन्न रूपये १.२० लक्ष पेक्षा कमी असावे.<br>३) लाभार्थ्याचे स्वत:च्या अथवा कुटुंबियांच्या मालकीचे राज्यात पक्के घर नसावे.<br>४) लाभार्थी हा महाराष्ट्र राज्याचा अधिवासी असावा.<br>५) लाभार्थी कुटुंबाने महाराष्ट्र राज्यात कोणत्याही विभागांतर्गत राबविण्यात येत असलेल्या घरकुल योजनेचा लाभ घेतलेला नसावा. |
| २. | **प्राधान्य क्रम** | सदरहू योजनेंतर्गत लाभार्थी निवड करतांना खालीलप्रमाणे प्राधान्य क्रम विचारात घेण्यात येईल.<br>१) विधवा/विधुर<br>२) दिव्यांग |

| | | |
|---|---|---|
| | | ३) अनाथ<br>४) परितक्त्या<br>५) कच्च्या घरामध्ये राहणारे<br>६) घरात कोणीही कमावत नाही अशा महिला<br>७) पूरग्रस्त क्षेत्र |
| ३. | **जिल्हा स्तरीय समिती** | सदरहू योजनेच्या अंमलबजावणीसाठी जिल्हाधिकारी यांच्या अध्यक्षतेखाली खालील प्रमाणे जिल्हा स्तरीय समिती असेल.<br>१) जिल्हाधिकारी - अध्यक्ष<br>२) मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद - सदस्य<br>३) प्रकल्प संचालक, जिल्हा ग्रामिण विकास यंत्रणा- सदस्य<br>४) उप अभियंता / शाखा अभियंता, जिल्हा ग्रामीण विकास यंत्रणा- सदस्य<br>५) सहाय्यक संचालक, इतर मागास बहुजन कल्याण विभाग - सदस्य सचिव<br><br>सदरहू जिल्हा स्तरीय समितीचे कार्य हे पुढील प्रमाणे राहील :-<br>सदरहू योजनेंतर्गत लाभार्थी निवडीचे अधिकार जिल्हाधिकारी यांच्या अध्यक्षतेखालील जिल्हास्तरीय समितीस राहतील. जिल्हास्तरीय समितीने निवड करुन प्रशासकीय मान्यता दिलेल्या पात्र लाभार्थ्यांना कार्योत्तर मान्यता व निधी उपलब्ध करुन देण्याबाबतचा प्रस्ताव संबंधित सदस्य सचिव हे संचालक, इतर मागास बहुजन कल्याण संचालनालय, पुणे यांचेमार्फत शासनास सादर करतील. योजनेंतर्गत निधीच्या उपलब्धतेनुसार प्रस्तावांना शासनस्तरावरुन कार्योत्तर मान्यता व निधी उपलब्ध करुन देण्यात येईल. तसेच, सदरहू योजनेची अंमलबजावणी ग्राम विकास विभागाच्या अधिपत्याखालील "संचालक, राज्य व्यवस्थापन कक्ष, ग्रामीण- गृहनिर्माण" यांच्यामार्फत करण्यात येईल. योजनेच्या अंमलबजावणीसाठी संचालक, इतर मागास बहुजन कल्याण संचालनालय, पुणे हे "नियंत्रक अधिकारी" आणि संचालक, राज्य व्यवस्थापन कक्ष, ग्रामीण- गृहनिर्माण हे "आहरण व संवितरण अधिकारी" म्हणून राहतील. |
| ४. | **लाभार्थ्यांनी सादर करावयाची कागदपत्रे** | १. सक्षम प्राधिकाऱ्याने दिलेले जात प्रमाणपत्र.<br>२. कुटुंबाचे वार्षिक उत्पन्न रूपये १.२० लाख पेक्षा कमी असल्याचे सक्षम प्राधिकाऱ्याने दिलेले उत्पन्नाचे प्रमाणपत्र.<br>३. अधिवास प्रमाणपत्र/ रेशनकार्ड/निवडणूक ओळखपत्र/मनरेगा जॉबकार्ड.<br>४. कुटुंबातील कोणत्याही व्यक्तीने महाराष्ट्र राज्यात इतर कोणत्याही ठिकाणी घरकुल योजनेचा लाभ घेतला नसल्याबद्दलचे रूपये १००/- च्या स्टँप पेपरवर शपथपत्र.<br>५. बचत खात्याच्या पासबुकची प्रत. |
| ५. | **घरकुलाचे क्षेत्रफळ** | सदरहू योजनेंतर्गत किमान २६९ चौ.फूट इतक्या क्षेत्रफळ असलेल्या घरकुलाचे बांधकाम करणे आवश्यक आहे. |
| ६. | **अर्थसहाय्य व प्रशासकीय** | सदरहू योजनेंतर्गत मंजूर करण्यात आलेल्या सर्वसाधारण क्षेत्रातील घरकुलासाठी प्रति घरकुल रुपये १.२० लक्ष व ४ टक्के प्रशासकीय निधी रुपये ४८००/- तसेच राज्य शासनाने घोषित केलेल्या डोंगराळ/दुर्गम क्षेत्रासाठी प्रति |

| | | |
|---|---|---|
| | **निधी** | घरकुल रुपये १.३० लक्ष व ४ टक्के प्रशासकीय निधी रुपये ५२००/- याप्रमाणे अनुज्ञेय राहील. सदरहू निधी संचालक, राज्य व्यवस्थापन कक्ष, ग्रामीण गृहनिर्माण यांच्या कार्यालयाकडे वर्ग करण्यात येईल. |
| ७. | **अर्थसहाय्य वितरण पद्धती** | सदरहू योजनेची अंमलबजावणी राज्य व्यवस्थापन कक्ष, ग्रामीण गृहनिर्माण कार्यालयामार्फत करण्यात येईल. तसेच, जिल्हा पातळीवर सदरहू योजनेची अंमलबजावणी प्रकल्प संचालक, जिल्हा ग्रामीण विकास यंत्रणा (DRDA) यांचेमार्फत करण्यात येईल. शासनास प्राप्त प्रस्तावांना योजनेंतर्गत निधीच्या उपलब्धतेनुसार कार्योत्तर मान्यता देण्यात येवून आवश्यक निधी उपलब्ध करुन देण्यात येईल. घरकुलाच्या बांधकामाच्या प्रगतीनुसार राज्य व्यवस्थापन कक्ष, ग्रामीण गृहनिर्माण कार्यालयाकडून ठरवून दिलेले बांधकाम पुर्ण झाल्याची खात्री झाल्यानंतर सार्वजनिक वित्तीय व्यवस्थापन प्रणालीद्वारे (PFMS) निधी लाभार्थ्यांच्या बँक खात्यावर वर्ग करण्यात येईल.<br>सदर योजनेतील लाभार्थ्यांना मनरेगा अंतर्गत अनुज्ञेय असलेले ९०/९५ दिवस (रुपये १९,५७०/- पर्यंत) अकुशल मजुरीच्या स्वरुपात संबंधित जलसंधारण आणि मनरेगा विभागांतर्गत अभिसरणाद्वारे अनुज्ञेय राहील. तसेच शौचालय बांधकामासाठी स्वच्छ भारत अभियानाअंतर्गत देय असलेले रुपये १२,०००/- किंवा सदर योजनेंतर्गत केंद्र शासनामार्फत वेळोवेळी लागू होणाऱ्या प्रोत्साहनपर अनुदान मिळण्यास लाभार्थी पात्र असेल, याबाबतची कोणतीही प्रतिपुर्ती विभागामार्फत करण्यात येणार नाही. |

४. या योजनेकरीता नवीन लेखाशिर्ष घेण्याची कार्यवाही स्वतंत्रपणे करण्यात येईल.

५. सदर शासन निर्णय वित्त विभागाच्या अनौ. सं.क्र.२०२५/०५, दिनांक ११/०४/२०२५ अन्वये प्राप्त सहमतीनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा सांकेताक २०२५०५१६१६११३००२३४ असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

SAHIL MAHADEV DHANWADE

Digitally signed by SAHIL MAHADEV DHANWADE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=OTHER BACKWARD BAHUJAN WELFARE DEPARTMENT, 2.5.4.20=393cd08ed02c7d151f264e32cdad83db848ccb3c33d5d6254e4ab7dc8c58b3b1, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=080CFC4AB018C3B658C71325006154CA250D25A3B8F476AC4EE4C2BD9C4CD79A, cn=SAHIL MAHADEV DHANWADE
Date: 2025.05.16 16:12:15 +05'30'

**( साहिल धनवडे )**
**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. मा. राज्यपाल यांचे सचिव, राजभवन, मुंबई.
२. मा. सभापती, विधान परिषद यांचे खाजगी सचिव.
३. मा. अध्यक्ष, विधानसभा यांचे खाजगी सचिव.
४. मा. मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई.
५. मा.उपमुख्यमंत्री (नगरविकास) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.

६. मा.उपमुख्यमंत्री (वित्त) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
७. मा. मंत्री, इतर मागास बहुजन कल्याण विभाग यांचे खाजगी सचिव.
८. सर्व मा. मंत्री यांचे खाजगी सचिव.
९. मा.विरोधी पक्षनेते, विधान परिषद / विधानसभा यांचे खाजगी सचिव.
१०. मा. मुख्य सचिव यांचे सह सचिव / उप सचिव.
११. प्रधान सचिव, इतर मागास बहुजन कल्याण विभाग, मंत्रालय, मुंबई.
१२. अपर मुख्य सचिव, नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई.
१३. अपर मुख्य सचिव, वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई.
१४. प्रधान सचिव, शालेय शिक्षण विभाग, मंत्रालय, मुंबई.
१५. सर्व सह सचिव / उप सचिव / अवर सचिव, इतर मागास बहुजन कल्याण विभाग, मंत्रालय, मुंबई
१६. जिल्हाधिकारी (सर्व).
१७. सर्व मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद.
१८. प्रकल्प संचालक, जिल्हा ग्रामिण विकास यंत्रणा.
१९.उप अभियंता / शाखा अभियंता, जिल्हा ग्रामीण विकास यंत्रणा.
२०.संचालक, राज्य व्यवस्थापन कक्ष, ग्रामीण गृहनिर्माण.
२१. संचालक, इतर मागास बहुजन कल्याण संचालनालय, महाराष्ट्र राज्य, पुणे.
२२.सर्व प्रादेशिक संचालक, इतर मागास बहुजन कल्याण (प्रादेशिक) विभाग.
२३. सर्व सहायक संचालक, इतर मागास बहुजन कल्याण.
२४. महालेखापाल - १/२ (लेखा व अनुज्ञेयता) / (लेखापरिक्षा), मुंबई / नागपूर.
२५. सर्व जिल्हा कोषागार अधिकारी.
२६. कक्ष अधिकारी (अर्थसंकल्प), इतर मागास बहुजन कल्याण विभाग, मंत्रालय, मुंबई.
२७.निवडनस्ती (योजना-३).